**जिल्हा रुग्णालय बीड अधिनस्त रुग्णालयांमधील विजसंच मांडणी करणे व फेरबदल करण्याच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२२/प्र.क्र.७९/आरोग्य ४**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २० जून, २०२३.

**वाचा :**

१) आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : आआसे/ कक्ष-३/टे-६/ बीडजिल्हाविद्युतकाम / २२१८-१९/२२, दिनांक १३.०३.२०२३.

२) शासन निर्णय क्र.प्रशामा २०२२/प्र.क्र.७९/आरोग्य ४,दि. १९.०५.२०२२

**प्रस्तावना :**

जिल्हा रुग्णालय बीड अधिनस्त रुग्णालयामधील विजसंच मांडणी करणे व फेरबदल करण्याच्या कामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

२. जिल्हा रुग्णालय बीड अधिनस्त रुग्णालयांमधील विजसंच मांडणी करणे व फेरबदल करण्याच्या ५ कामांचे एकुण रु. रु.६,१४,०७,८०३/-इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सन २०२१-२२ च्या दर सुचिवर आधारीत कार्यकारी अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद यांनी तयार केले आहेत. सदर १३ कामांचे एकुण रु. रु.६,१४,०७,८०३/- ( अक्षरी सहा कोटी चौदा लक्ष सात हजार आठशे तीन रुपये फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालीलप्रमाणे, त्या पुढील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र | आरोग्य संस्था | अंदाजपत्रकीय रक्कम | शेरा |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा रुग्णालय, बीड | रु.२,६९,२२,७९८ | ओपीडी ओटी वॉर्ड नं. ४, टी.बी. हॉस्पीटल, २० खाटाचे पोस्ट ऑपरेटीव्ह रुम विजसंच मांडणी करून अंदाजे ३० वर्ष पूर्ण झाली असुन तेथील सर्व अंतर्गत विजसंच मांडणी तसेच पथदिवे, ट्रान्सफॉर्मरची जागा बदलणे इ. बाबी अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. |
| २ | ग्रामीण रुग्णालय, तालखेड, ता. माजलगाव | रु. ६४,५३,५२४/- | येथील विजसंच मांडणी करून अंदाजे २० वर्ष पूर्ण झाली असुन तेथील सर्व अंतर्गत विजसंच मांडणी तसेच पथदिवे बदलण्याच्या बाबी हया अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. |
| ३ | ग्रामीण रुग्णालय, चिंचवण, ता. वडवणी | रु. ६५,५१,८९४/- | येथील विजसंच मांडणी करून अंदाजे ४० वर्षे पूर्ण झालेली असून तेथील सर्व अंतर्गत विजसंच तसेच पथदिवे बदलण्याच्या बाबी अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. रुग्णालयाची सध्याची इमारत जीर्ण झालेली असून इमारत तोडण्यात येणार असून त्या जागी नवीन इमारत बांधण्यात येणार असल्याने विद्युतचे अंदाज पत्रक रद्द करण्यात यावे अशी कार्यालयाची धारणा आहे. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | उपजिल्हा रुग्णालय, परळी | रु.१,४३,९४,९२३/- | येथील विजसंच मांडणी करून अंदाजे २० वर्ष पूर्ण झाली असुन तेथील सर्व अंतर्गत विजसंच मांडणी तसेच पथदिवे बदलण्याच्या बाबी हया अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. |
| ५ | ग्रामीण रुग्णालय,आष्टी | रु. ७०,८४,६६४/- | येथील विजसंच मांडणी करून अंदाजे ३२ वर्ष पूर्ण झाली असुन तेथील सर्व अंतर्गत विजसंच मांडणी तसेच पथदिवे बदलण्याच्या बाबी अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. |
| | **एकुण** | **रु.६,१४,०७,८०३/-** | |

**अटी व शर्ती :-**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास मुख्य अभियंता, (विदयुत) सार्वजनिक बांधकाम विभाग यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक दिनांक २९.१०.२०१८ अन्वये अंदाजपत्रकातील दरसुची बाहय दर मंजुरी करणे बंधनकारक आहे.

३) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर कामाची वेगवेगळी निविदा न करता सर्व कामाची एकत्रित निविदा करण्यात यावी.

५) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

६) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

७) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या त्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

८) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधि त नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

९) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही - २०१३/ प्र.क्र.१७७ /तां.क.१ दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त खर्च लेखाशिर्ष लेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- ११०- रुग्णालय व दवाखाने, (०१) अ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती (००) (०१) मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३- मोठी बांधकामे" आणि "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०२- ग्रामीण आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य) - रुग्णालय व दवाखाने, (०४) सार्वजनिक आरोग्य,१०४- सामुहिक आरोग्य केंद्र, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ०३९१), ५३- मोठी बांधकामे" याखालील मंजूर अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३विनियम,भाग-२,दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०५१७३६२५५११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.06.21 12:18:40 +05'30'

**(अशोक मा.आत्राम )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

३. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.

४. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, लातूर

५. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, बीड

६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. बीड

७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. निवडनस्ती (आरोग्य-४).